**प्रशासकीय मान्यता**

नव्याने सुरु होणाऱ्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालय जळगांव यांच्याशी संलग्नित जिल्हा सामान्य रुग्णालय येथील आवारातील विविध विभागामधील किरकोळ दुरुस्त्या व नुतनीकरणांची कामे.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : जीसीजे-२०१८/प्र.क्र.११२/प्रशा-१**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : ०६ जून , २०१८.

**वाचा :** संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/शावैमज/एमसीआय.नुतनीकरण/८२८/प(आय)/२४५९/१८, दिनांक ०५.०३.२०१८

**शासन निर्णय :-**

भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या निकषांची पुर्तता करण्याच्या दृष्टीने नव्याने सुरु होणाऱ्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालय जळगांव यांच्याशी संलग्नित जिल्हा सामान्य रुग्णालय येथील विविध विभागांतर्गत इमारतीच्या दुरुस्ती, लाकडी व काचेचे पार्टीशान इत्यादी खालील तक्त्यात दर्शविलेल्या व सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविलेल्या एकूण रुपये ३६,६६,०११/- (रुपये छत्तीस लक्ष सहासष्ठ हजार अकरा फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्थापत्य दुरुस्ती बांधकामाचे नाव | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सा.बां.विभागाने सहमती दर्शविलेली किंमत रुपये |
|---|---|---|---|
| १ | Renovation of Various Departments ( As per MCI Norms) for Govt. Medical College, Jalgaon in Civil Hospital at Jalgaon Dist.Jalgaon (Partitions, doors and windows repairs, flooring, colouring, Paver Blocks, Main Gate, Staircase etc.) | ४०,२८,५५७/- | ३६,६६,०११/- |
| | **एकूण** | **४०,२८,५५७/-** | **३६,६६,०११/-** |

**अटी व शर्ती :-**

१) सदर कामाच्या अनुषंगाने तांत्रिक मंजुरी देताना, वारंवारितेनुसार साहित्याच्या आवश्यक सर्व चाचण्या करुन घेण्याची बाब संबंधीतांनी विचारात घेणे आवश्यक आहे.

२) Dismantled Materials मधून निघणाऱ्या उपयुक्त साहित्याबाबत सार्वजनिक बांधकाम प्रचलित पध्दतीनुसार कार्यवाही करावी.

३) मंजूर राज्य दरसूचीबाहय बाबींच्या दरास संबंधीत अधीक्षक अभियंता यांनी मंजुरी देताना शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करावी.

४) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

५) कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ०७.०२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

२. सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. निधीची तरतूद झाल्यानंतर सदर काम हे खाली नमूद केलेल्या लेखाशीषाअंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एस-०१ (अनिवार्य)
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०५-वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा
०३-वैद्यक महाविद्यालये
(०३) (३२) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव
(२२१० जी ३३१) २७- लहान बांधकामे

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला - उप विभाग पाच मधील महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार मधील अ.क्र.३, परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४४/इमा-३, दिनांक १०.०४.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०५१८४६०३००१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.06.06 11:17:27 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर, महाराष्ट्र.
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,जळगांव.
४. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारत-३) मंत्रालय, मुंबई.
५. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.
७. निवडनस्ती (प्रशा-१).